**कै.चाँद खा इब्राहीम खा पठाण यांच्या रोजंदारीवरील सेवा नियमित करून आर्थिक लाभ अदा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अवमान-२०१४/प्र.क्र.१६६/पापु-१५

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
तारीख: २२ ऑक्टोबर, २०१९

वाचा :-

१) **महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर खंडपीठ, नागपूर यांचे मुळ अर्ज क्र. ५८९/२०१७ व ६०५/२०१७ मधील आदेश दिनांकः** ०४/०१/२०१९

२) **शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-१००९/प्र.क्र.३७/पापु-१५, दिनांक ०१/०४/२०१५

३) **संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांकः** प्रशासन/आस्था-६/सीआर-३५/१२८/२०१९, दिनांक १२/०३/२०१९.

प्रस्तावना :-

कै.चाँद खा इब्राहीम खा पठाण हे वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, चंद्रपूर या कार्यालयामध्ये दिनांक ०९/०१/१९८६ पासून कामाच्या उपलब्धतेनुसार रोजंदारी तत्वावर कार्यरत होते. कै. पठाण यांनी शासनाच्या विरोधात मा. उच्च न्यायालयामध्ये सेवा नियमित करण्याबाबत याचिका दाखल केली होती. या याचिकेवर मा. उच्च न्यायालयाने दिनांक १७/१०/२०१३ रोजी आदेश पारीत करून त्यांच्या रोजंदारीवरील सेवा नियमित करण्याच्या अनुषंगाने निर्णय घेण्याचे निर्देश शासनास दिले होते. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार कै. पठाण यांची सेवा संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये दिनांक १०/०१/२०१४ पासून नियमित करण्यात आली आहे.

कै. चाँद खा इब्राहीम खा पठाण, पहारेकरी यांच्या पत्नीने मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणामध्ये मुळ अर्ज क्र. ५८९/२०१७ दाखल करून कै. पठाण यांच्या सेवा रूजू दिनांकापासून नियमित करून त्यानुषंगाने आर्थिक लाभ अदा करण्याचे तसेच त्यांचा मुलगा शहीद इब्राहीम खा पठाण यास अनुकंपा तत्वावर नोकरी मिळण्याची मा. न्यायाधिकरणास विनंती केली होती.

मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने कै. पठाण यांचा मूळ अर्ज क्रमांक ५८९/२०१७ व श्री. मानकर यांचा मुळ अर्ज क्र. ६०५/२०१७ हे दोन्ही समान विषयावर आधारित असल्याने, दोन्ही अर्जांवर एकत्रितपणे संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक ०४/०१/२०१९ रोजी आदेश पारीत करून कै. चाँद खाँ इब्राहीम खा पठाण यांच्या रोजंदारीवरील सेवा दिनांक ०९/०१/१९९१ पासून नियमित करून त्यांना सर्व अनुषंगिक आर्थिक लाभ सहा महिन्याच्या आत अदा करण्याचे निर्देश दिले आहेत.

प्रस्तुत प्रकरणी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर खंडपीठ, नागपूर मधील सादरकर्ता अधिकारी, सहसचिव, विधी व न्याय विभाग, नागपूर आणि वित्त विभाग यांचे अभिप्राय विचारात घेता कै.चाँद खा इब्राहीम खा पठाण, पहारेकरी यांच्या सेवा दिनांक ०९/०१/१९९१ पासून नियमित करून त्यांना सर्व अनुषंगिक आर्थिक लाभ अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वरिल वस्तुस्थिती तसेच मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर खंडपीठ, नागपूर यांचे मुळ अर्ज क्र. ५८९/२०१७ मधील दिनांक ०४/०१/२०१९ रोजीचे आदेश विचारात घेता कै. चाँद खा इब्राहीम खा पठाण यांच्या भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील सेवा दिनांक ०९/०१/१९९१ पासून नियमित करण्यात येत आहेत.

संचालक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे तसेच प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर विभाग, नागपूर यांना कळविण्यात येते की, कै.चाँद खा इब्राहीम खा पठाण यांच्या सेवा नियमित केलेल्या आदेशामध्ये आवश्यक दुरूस्ती करून सुधारीत आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

कै. चाँद खा इब्राहीम खा पठाण यांच्या सेवा नियमित दिनांकामध्ये सुधारणा करण्यात आलेली असल्याने, कै.पठाण यांना दिनांक ०९/०१/१९९१ पासून अनुज्ञेय होणारी थकबाकी तसेच सर्व अनुषंगिक आर्थिक लाभ यांची परिगणना करून ही थकबाकी व लाभ कै. पठाण यांच्या कायदेशीर वारसास तातडीने अदा करण्यात यावी. तसेच त्यांच्या कायदेशीर वारसास अनुज्ञेय होणारे लाभ देखील अदा करण्यात यावेत.

कै. चाँद खा इब्राहीम खा पठाण यांना दिनांक ०९/०१/१९९१ पासून अदा करावयाच्या थकबाकी व अनुषंगिक लाभांकरीता होणारा खर्च हा भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील कर्मचाऱ्यांचे वेतन

व भत्ते अदा करण्यासाठी ज्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात त्याच लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या चालू आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावेत.

सदर शासन निर्णय वित्त विभागाकडील अनौपचारीक संदर्भ क्रमांक १२८/१९/व्यय-३, दिनांक ११/०९/२०१९ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०२२१३०४२९३४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2019.10.22 14:47:05 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे-०५
२. प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर विभाग, नागपूर
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१ व २, महाराष्ट्र, मुंबई व नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ व २, महाराष्ट्र, मुंबई व नागपूर.
५. उपसचिव, व्यय-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, चंद्रपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
८. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
९. निवड नस्ती, कार्यासन (पापु-१५)